**तहसीलदार संवर्गातील ७४ परिविक्षाधीन उमेदवारांच्या अधिसंख्य पदांना दि.३०/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- ईएसटी-२०२२/प्र.क्र.०२/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १० जुलै, २०२४.

**संदर्भ**:-१. वित्त विभाग, शासन निर्णय, पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१,दिनांक २०/०२/२०१६.
२.सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.टिआरएन-०५१६/प्र.क्र.८४/ १२अ, दि.२०/१/२०१४
३. कार्यालयीन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-१०२१/प्र.क्र.२९/ सीपीटीपी-अ,दिनांक २४/१२/२०२१.
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक ईएसटी-२०२२/प्र.क्र.०२/ई-८, दि.१३/०१/२०२२
५. सामान्य प्रशासन विभाग,पत्र क्र. टिआरएन-२०२४/प्र.क्र.०५/प्रशि-२, दिनांक १८/०१/२०२४
६. महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्रमांक ईएसटी-२०२२/प्र.क्र.०२/ ई-८,दि.२२/०३/२०२४

**प्रस्तावना :-**

राज्यसेवा (मुख्य) परीक्षा-२०१९ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या राज्यसेवा परीक्षा-२०१९ द्वारे सरळसेवेने नियुक्त झालेल्या गट -अ संवर्गातील ३९ परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी व ७४ तहसिलदार अशा एकूण ११३ परिविक्षाधीन उमेदवारांना उपरोक्त संदर्भ क्र.४ अन्वये दि.१७/०१/२०२२ ते दि.१६/०१/२०२४ या दोन वर्षाच्या कालावधीकरीता अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली होती. तद्नंतर सदर परिविक्षाधीन उमेदवारांना सेवाज्येष्ठतेनुसार संवर्ग वाटप होईपर्यंत सदर अधिसंख्य पदाच्या कालावधीस दिनांक १७/०१/२०२४ ते दि.३०/०६/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. तथापि, अदयापही परिविक्षाधीन तहसिलदार “गट-अ” संवर्गातील उमेदवारांना विभागीय संवर्ग वाटप करण्याची प्रक्रिया अंतीम झालेली नाही. यास्तव, परिविक्षाधीन तहसिलदार यांचे वेतन अदा करण्यासाठी सदर अधिसंख्य पदांना दिनांक ३०/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यसेवा (मुख्य) परीक्षा-२०१९ च्या अंतर्गत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या व सामान्य प्रशासन विभागाने प्रशिक्षणांतर्गत कार्यक्रमासाठी नियुक्त केलेल्या "गट-अ" या संवर्गातील परिविक्षाधीन तहसिलदार, यांची ७४ अधिसंख्य पदे दि.१७/०१/२०२२ ते दि.१६/०१/२०२४ या दोन वर्षाच्या कालावधीकरीता निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात आली होती. तद्नंतर सदर परिविक्षाधीन उमेदवारांना सेवाज्येष्ठतेनुसार संवर्ग वाटप होईपर्यंत सदर अधिसंख्य पदाच्या कालावधीस दिनांक १७/०१/२०२४ ते दि.३०/०६/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

आता, सदर ७४ परिविक्षाधीन तहसिलदार यांच्या सेवाज्येष्ठतेनुसार विभागीय संवर्ग वाटप करण्याची प्रक्रिया अंतीम झालेली नसल्यामुळे **सदर अधिसंख्य पदांना दिनांक ३०/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यास मान्यता देण्यात येत आहे.**

२. सदरहू ७४ परिविक्षाधीन तहसिलदार यांच्या अधिसंख्य पदांच्या वेतनावरील होणारा खर्च परिविक्षाधीन उमेदवार जिल्हानिहाय प्रशिक्षणासाठी वर्ग केलेल्या जिल्ह्याकरिता "मागणी क्र. सी-१, २०५३- जिल्हा प्रशासन (००)(०९३) जिल्हा आस्थापना (०१) सर्व साधारण आस्थापना (०१)(०१) आयुक्त कोकण (२०५३ ००२८)/ आयुक्त नाशिक (२०५३ ००४६)/आयुक्त पुणे (२०५३ ००६४)/ आयुक्त अमरावती (२०५३ ००८२)/ आयुक्त नागपूर (२०५३०१०८)/आयुक्त छत्रपती संभाजीनगर (२०५३ ०१२६) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातुन भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि- २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२०/०२/२०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७१०१५०८१७८९१९ असा आहे. उक्त शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUNIL SHRIDHARRAO KOTHEKAR

Digitally signed by SUNIL SHRIDHARRAO KOTHEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=bc3e3742bf263c80937ab54c636ad893656171177467ba8656a12c226f3029a2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=C55205CA6D1113BFAEC735BD2D1C5326D6B007C5CD3A46A6E4C4857E58AD2AFE, cn=SUNIL SHRIDHARRAO KOTHEKAR
Date: 2024.07.10 15:19:22 +05'30'

**( सुनिल कोठेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.अ.मु.स. (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय,मुंबई-३२१.
२. विभागीय आयुक्त(सर्व)
३. जिल्हाधिकारी (सर्व)
४. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे.
५. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंपाजवळ, अमरावती रोड, नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. जिल्हा कोषागार अधिकारी,(सर्व)
९. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर.
१०.वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई - ३२.
११. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग ( सीपीटीपी-ब), मंत्रालय, मुंबई - ३२.
१२.सह सचिव / उप सचिव (कार्यासन ब-१/ ई-९) महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई - ३२.
१२.निवड नस्ती, (कार्यासन ई-८), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.